**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय (खुद्द) मधील पदांचा सुधारीत आकृतिबंध निश्चित करणे**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सववि ३३१४/ प्र. क्र. ३५७ / आस्था १**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २८ ऑगस्ट, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्रमांक असंक-१००१/ प्र. क्र. २९/०१/वित्तीय सुधारणा, दिनांक १०/९/२०११
२) शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सववि ३३०९/ प्र. क्र. १५९/आस्था १, दिनांक २९/१०/२०११
३) शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सववि-३३.१२/प्र. क्र. ५४९/आस्था-१, दिनांक ८/५/२०१४

**प्रस्तावना**

पदनिर्मीती, पदभरती व पदांचे पूनरूज्जीवन याबाबतचे निर्बंध व आकृतिबंध आढावे आणि अतिरिक्त संवर्ग योजनांतर्गत कक्षाची स्थापना व त्याचे व्यवस्थापन याबाबत वित्त विभागाच्या दिनांक १०/९/२०११ च्या शासननिर्णयान्वये सविस्तर आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

वित्त विभागाच्या दिनांक १०/९/२०११ च्या शासननिर्णयास अनुसरून, मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २२/११/२०११ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या ६८ व्या बैठकीत घेण्यात आलेल्या विभागातील पदांचा आढाव्यानुसार, विभागासाठी एकूण २२२ इतक्या पदांच्या आकृतिबंधास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार, दिनांक २९/१२/२०११ च्या शासननिर्णयान्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या ( खुद्द विभागाच्या) संवर्गनिहाय एकूण २२२पदांचा आकृतिबंध निश्चित करण्यात आला आहे.

२. त्यानंतर, मा. मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १७/२/२०१४ रोजी झालेल्या उच्च स्तरीय समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार, विभागामार्फत राबविण्यात येणा-या वस्त्रोद्योग धोरणाच्या अंमलबजावणीसाठी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवर विभागाच्या दिनांक ८/५/२०१४ च्या शासननिर्णयानुसार, नव्याने पदांची निर्माती करण्यात आली आहे.

३. शासननिर्णय दिनांक २९/१२/२०११ नुसार निश्चित केलेला आकृतिबंध आणि शासननिर्णय दिनांक ८/५/२०१४ नुसार नव्याने निर्माण केलेली पदे विचारात घेवून, खुद्द विभागाच्या आस्थापनेवरील पदांचा आकृतिबंध निश्चित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासननिर्णयान्वये, खालील प्रपत्र **अ** मध्ये दर्शविल्यानुसार, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग ( खुद्द) मधील एकूण २२६ पदांच्या सुधारीत आकृतिबंधास मान्यता देण्यात येत आहे.

प्रपत्र अ

सहकार, पणन व वस्त्रोद्योग ( खुद्द) विभागाचा सुधारीत आकृतिबंध

| अ.क्र. | सवंर्ग | मंजूर पदे |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव/सचिव | २ |
| २ | सह सचिव/उप सचिव | ७ |
| ३ | अवर सचिव | ९ |
| ४ | कक्ष अधिकारी | २३ |
| ५ | सहाय्यक | ४८ |
| ६ | सहाय्यक लेखा अधिकारी | ३ |
| ७ | वरिष्ठ स्वीय सहाय्यक | १ |
| ८ | उच्चश्रेणी लघुलेखक | ८ |
| ९ | निम्नश्रेणी लघुलेखक | १२ |
| १० | लघुटंकलेखक | ३ |
| ११ | लिपीक/लिपीक-टंकलेखक | ७६ |
| १२ | वाहन चालक | ३ |
| १३ | नाईक | ७ |
| १४ | शिपाई | २३ |
| १५ | सफाईगार | १ |
| | एकूण f | २२६ |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८३०१७३४४४३१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manjiri Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2014.08.30 17:31:23 +05'30'

( मं. ग. जोशी)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
४. मा. मंत्री, (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री, (पणन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री, (वस्त्रोद्योग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. राज्यमंत्री, ( सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा. राज्यमंत्री, (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. राज्यमंत्री, (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई